# महाराष्ट्र शासन

संगणक सांकेतांक - 201109191631360001

**प्रमुख खनिजासंबंधात खनिज सवलत प्रस्तावांची परिपूर्ण छाननी करण्यासाठी जिल्हास्तरावर सल्लागार समिती गठीत करण्याबाबत.**

उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
शासन निर्णय क्रमांक - एमएनजी-१०१०/ प्र.क्र. ३३५६/उद्योग-९
दिनांक- १७ सप्टेंबर, २०११

**प्रस्तावना-**

प्रमुख खनिजासंदर्भात पूर्व पहाणी, पूर्वेक्षण अनुज्ञप्ती व खाणपट्टा अशा खनिकर्म सवलती शासनाव्दारे मंजूर करण्यात येतात. त्यासाठी विविध जिल्ह्यातून प्रस्ताव शासनाला प्राप्त होत असतात. त्याच प्रमाणे परवानगी दिलेल्या खनिकर्म प्रकल्पांच्या बाबतीत जिल्ह्यामध्ये विविध प्रश्न उपस्थित होत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. शक्य असेल त्याठिकाणी स्थानिक स्तरावर अशा प्रश्नाचे निराकरण करुन शासनाकडे प्रस्ताव सादर करण्यापूर्वी अशा प्रस्तावांची परिपूर्ण छाननी करून त्याबाबत शासनाला सल्ला देण्यासाठी एक समिती गठीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-** विविध जिल्ह्यातून प्रमुख खनिजासंदर्भात प्राप्त होणा-या खनिज सवलत प्रस्तावांची परिपूर्ण छाननी करुन शासनाला सल्ला देण्यासाठी खाली नमूद केल्याप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय यांचे प्रतिनिधी. | सदस्य |
| ३. | महाराष्ट्र प्रदुषण मंडळाचे संबंधित अधिकारी | सदस्य |
| ४. | प्रादेशिक परिवहन अधिकारी | सदस्य |
| ५. | संबंधित तहसिलदार | सदस्य |
| ६. | उप वन संरक्षक | सदस्य |
| ७. | जिल्हा खनिकर्म अधिकारी | सदस्य सचिव |

**कार्यकक्षा-** खनिज सवलतीसाठी अधिसूचनेपूर्वी व अधिसूचनेनंतर प्राप्त झालेल्या अर्जातील आवेदित क्षेत्राची

१. क्षेत्रातील मानव निर्मित वा नैसर्गिक वैशिष्टये
२. यापूर्वी त्याच क्षेत्रावर खनिज सवलत देण्यात आली आहे किंवा कसे
३. हक्कनोंद अभिलेखातील नोंदी व्यतिरिक्त वन विभागाकडून वन संवर्धन अधिनियम लागू होतो किंवा कसे याची खातरजमा

४. आवेदित क्षेत्राची पर्यावरणदृष्ट्या संवेदनशीलता
५. सवलत मंजूरीबाबत स्थानिक जनतेचा कल
६. उत्खननानंतर खनिज वाहतूकीमुळे गावातील वाहतूक वर्दळ वा अपघात टाळून वाहतूक व्यवस्था करण्याची शक्यता
७. उत्खननामुळे भूगर्भातील पाणी, पिण्याचे पाणी व पाण्याची पातळी यावरील परिणाम
८. धार्मिक स्थळे, इनाम जमिनी इत्यादी

या मुद्यांच्या आधारे परिपूर्ण छाननी करून शासनाला सल्ला देणे.

समितीचा सल्ला समाविष्ठ नसलेले खनिज सवलतीचे प्रस्ताव शासनस्तरावर विचारात घेतले जाणार नाहीत.

**समितीची बैठक** - अधिसूचनेपूर्वी वा अधिसूचनेनंतर खनिज सवलतीचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर आवश्यकते नुसार तथापि, २ महिन्यातून एकदा समितीची बैठक घेण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( व.शं.कुलकर्णी )
शासनाचे अवर सचिव

प्रत-
अपर मुख्य सचिव (वने ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (पर्यावरण ) पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (परिवहन ) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.राज्यमंत्री (खनिकर्म ) यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव (उद्योग व खनिकर्म ) यांचे स्वीय सहाय्यक
मुख्य वन संरक्षक , नागपूर
संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर
सदस्य सचिव , महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ
परिवहन आयुक्त महाराष्ट्र राज्य मुंबई
सर्व जिल्हाधिकारी

त्यांना विनंती करण्यात येते की, जिल्हास्तरावरील सर्व संबंधितांना शासन निर्णयाची प्रत उपलब्ध करून द्यावी.

( व.शं.कुलकर्णी )
शासनाचे अवर सचिव